# हॅनाचा रस्ता

लिंडा ग्लासेस



# हॅनाचा रस्ता

लिंडा ग्लासेस



मराठी : प्रतीक्षा

"ह्या शनिवारी आपला वर्ग पिकनिकला जाणार आहे,"
मिस हार्टली नि सगळ्यांना आठवण करून दिली .

हॅनाचे हृदय जोरजोरात धडधडु लागले.
पिकनिक! कदाचित आता ती काही मित्र बनवेल.

"आम्ही, ग्रोव्ह पार्कमध्ये एक जागा आरक्षित केली आहे," तीच्या शिक्षिका पुढे जाता जाता म्हणाल्या , "तुम्हाला गाडीची गरज असल्यास मला सांगा." हॅनाचा चेहरा पडला . गाडी? आणि ते पण शनिवारी?



मिनियापोलिसच्या मित्रांना तिची दुविदा समजली असती. पण इथे उत्तर मिनेसोटा मध्ये कोणाला हि तिची समस्या समजु शकली नसती. कारण पूर्ण शाळेमध्ये दुसरं कोणीच यहुदी नव्हतं .

"जर बाबांनी त्यांची नोकरी नसती गमावली, " हॅनाने विचार केला.  जर फक्त काका मॅक्सने त्यांना त्याच्या जनरल स्टोअरमध्ये लोखंडी रेंजवर कामाला येण्यास सांगितले नसते. तर ती तिच्या मित्र-मैत्रिणी पासून एवढी दुर नसती झाली .





त्याच रात्री तिने झोपण्याअगोदर,
पिकनिक बद्दल तिच्या आई-
वडिलांना सांगितले ,
"मी जाऊ शकते का?”
"हॅना," आईच्या डोळ्यात नकार दिसत
होता .

" गाडीतून प्रवास आणि तो पण शनिवारी ?"

"फक्त ह्या वेळेस?" हॅना ने विनंती केली .

बाबांचा आवाज शांत पण खंबीर होता.

"तुला माहित आहे कि शनिवार
हा आपला आरामाचा दिवस आहे .

आपण सब्बाथ (शनिवारी ) दिवशी काम
करत नाही किंवा गाडी चालवत नाही. "

आपल्या बेडवर पडून हॅना रडतं होती. नवीन असणं आणि मित्र-मैत्रीण नसणं हे खूप कठीन होतं.आणि आता तीला वर्गाची पिकनिक सुद्धा चुकवावी लागणार होती .



दुसऱ्या दिवशी स्पेलिंग शिकतांना, हॅनाने तिच्या वर्गमित्रांकडे पहिले. त्यातल्या खूप मोजक्या जणांना ती नावानिशी ओळखत होती. पीटर मोठ्याने बोलत होता.

सैली नेहमीप्रमाणे बरोबर उत्तर देण्यासाठी हाथ वरती करत होती.

रूथ, हॅनाच्या शेजारी बसली होती, तिला चित्र काढायला आवडायचं. त्यापैकी कोणाला समजेल का?





त्या दिवशी रात्री हॅनाने पुन्हा प्रयत्न केला . "मी गाडीतून प्रवास का नाही करू शकत? आणि मी थोडीना गाडी चालवणार आहे,फक्त गाडीत बसणार आहे."

बाबांचे डोळे काळे झाले. "फक्त समाजात दुसरे कोणी ज्यू लोक नाहीत त्यामुळे आपण आपल्या लोकांचे मार्ग विसरू शकतं नाही."

"कृपया आम्हाला समजून घे," आई प्रेमाने म्हणाली.

"आमची इच्छा आहे कि तुला जाता यावं ."

मला आपल्या लोकांच्या मार्गाने नाही जायचंय, मला फक्त पिकनिकला जायचं आहे. पण तिने तिची जीभ आवरती घेतली.

दुसऱ्या दिवशी खेळाच्या मैदानावर सगळेजण पिकनिकसाठी योजना बनवत होते. ते कोणासोबत प्रवास करणार आहेत? कोणासोबत ते जेवण करणार आहेत? हॅनाला तिचे कान बंद करूण घेऊ वाटतं होते. "जर कोणाला यायचं असेल तर सांगा, माझ्या गाडीत जागा आहे ," परफेक्ट सैलीने घोषणा केली .

"हॅना !" पीटर खेळाच्या मैदानावर ओरडला . "तू कोणासोबत येणार आहेस ?" आता सगळ्यांच्या नजरा तिच्याकडे होत्या .



"मी- मला अजून माहित नाही." हॅना माघे वळाली.

रूथ घासाची दोरी बनवण्यात व्यस्त होती. तिने हॅनाकडे पहिले आणि स्मित हास्य केलं जणू तिला हॅनाशी मैत्री करायची होती. हॅना आशेने परत हसली .

जेव्हा वर्ग संपला, हॅना माघेचं थांबली. "मिस हार्टली," तीने हळू आवाजात सुरुवात केली. "मला पिकनिक बद्दल बोलायचं आहे ... मला- मला जायाचं आहे. पण .... गाडीबद्दल ....." ती तरी कशी समजून सांगणार? तिला सांगायला खूप विचित्र वाटतं होतं .

"मला समजतंय ." मिस हार्टली हसल्या. "तुला गाडी हवी आहेना. काळजी करू नको. मी तुझ्यासाठी गाडीचा बंदोबस्त करेल." त्यांनी हॅनाला तिच्या डोक्यावर एक आश्वासक थाप दिली . "तू मला सांगितलंस याचा मला खूप आनंद आहे." हॅना तिथे काही क्षण थांबली,पण ती पुढे काहीचं बोली नाही .



शाळेतुन घरी जाताना, रस्त्यावर पडलेल्या दगडांना लाथ मारत ती विचार करत होती कि ह्या समस्याच काहीतरी समाधान असेल. आणि अचानक तिला तिच्या समस्याच समाधान मिळालं .



" आई, बाबा," ती धाडकन घरात शिरली. "मी शनिवारी पाई चालत पार्कला जाणार !"

आईने मान हलवली. "पार्क इथून दोन मैल दूर आहे. तू एकटी तिथे नाही जाऊ शकणार. "

"जर कोण्ही माझ्यासोबत आलं तर ?" हॅनाने विनवणी केली.

आईने बाबांकडे पाहिलं.

बाबांनी होकार्थी मान हलवली. "हा चांगला विचार आहे. "

हॅनाला नाचावंसं वाटलं ! निदान आता तरी तिला संधी मिळाली होती .

दुसऱ्या दिवशी , हॅनाने  रुथच्या चित्राकडे पहिलं आणि हसून म्हणाली "मला तू काढलेला घोडा आवडलाय. "

"धन्यवाद " रूथ हसली .

विचार! हॅना स्वतःशी बोली. विचार! पण जर रूथ म्हणाली ,

"तुम्ही शनिवारी गाडीमध्ये बसू शकतं नाही ? किती विचित्र !" संपूर्ण दिवस गेला आणि तरीही ती विचारू शकली नाही .

दुसऱ्या दिवशी शुक्रवार होता . ती तिची शेवटची संधी होती , हॅनाने रुथशी काय बलायचं होत ते ठरवलं होतं . तिने त्याचा डोक्यात सराव देखील करून ठेवला होता :" मला माहित आहे कि हा मूर्खपणा वाटू शकतो ... " पण जेव्हा सकाळची घंटा वाजली तेव्हा रुथची सीट रिकामी होती .



जेव्हा संगळेजण जेवायला गेले , हॅना चालत शिक्षकाच्या टेबलाकडे गेली. तिने मोठा श्वास घेतला . " मिस हार्टली ,पिकनिक बद्दल .... " ती बोलण्यासाठी योग्य शब्द शोधत होती .

" अरे, मी तुला सांगायचं विसरले? " मिस हार्टली ने विचारलं .

"तू सैलीच्या गाडीतून येऊ शकतेस . "

हॅनाने मान हलवली . ह्या वेळेस तिला बोलणं गरजेचं होतं .

"मला - मला गाडीतून जाण्याची परवानगी नाही " ती म्हणाली , "रूढीवादी ज्यु लोकं शनिवारी गाडीतून प्रवास करत नाही ."

ती पुढे म्हणाली , " पण मी कोणासोबत तरी चालतं येऊ शकते . पण मला माहित नाही कि कोण माझ्यासोबत चालतं  येईल ."

मिस हार्टलीने दयाळू भावनेने हॅनाकडे पाहिलं .

" बरं केलंस तू हे मला सांगितलंस  " मी बघते आपल्याला काय करता येईल ते . "

पूर्ण जेवण होऊ पर्यंत हॅना विचार करत होती . मिस हार्टली कोणाला विचारतील ? कदाचित सैली . परफेक्ट सैली .



दुपारच्या जेवणानंतर , मिस हार्टली ने घंटा वाजवली . "क्लास , मला आता असं कळालं आहे कि हॅनाला शनिवारी गाडीतून प्रवास करण्यासाठी मनाई आहे .  तिच्या ज्यु समाजाच्या श्रद्धेनुसार , शनिवारी विश्रातीचा दिवस आहे .

"पण ती आपल्यासोबत एका मार्गाने येऊ शकते ," मिस हार्टली पुढे म्हणाल्या.

"हॅना ,कृपया सगळ्यांना सांगशील ."

हॅना तिच्या बाकाकडे टक लावून बघतं होती. मी - मी येऊ शकते पण कोणालातरी माझ्यासोबत पाई यावं लागेल." ती कुजबुजत म्हणाली.

"कोणी येऊ शकेल का ?" मिस हार्टली नि विचारलं .

वर्ग शांत होता . हॅनाचं हृदय धडधडत होतं . कोणीच येणार नाही , ती स्वतःशी म्हणाली . हि खूप मूर्ख कल्पना आहे.

तेवढ्यात एका बाकाचा आवाज आला . हॅनाने मान वर करून पाहिलं.



सगळ्यांचे हाथ वर हवेत होते !

## लेखकाचे मनोगत

मला ह्या गोष्टीची प्रेरणा मिनिसोटा हिस्ट्री सेंटर मध्ये १९९६ साली मिळाली , ज्याचं शिर्षक होतं "अनपैकिंग ऑन द प्रेअरी :ज्युईश वुमेन  इन अप्पर मिडवेस्ट . " त्यामध्ये एका यहुदी मुलीची गोष्ट होती ती मला खूप आवडली . जेव्हा तिने तिच्या शिक्षिकेला सांगितलं कि ती रूढीवादी ज्यु समाजाची असल्यामुळे तिला शनिवारी वर्गाच्या सहलीला जाण्याची परवानगी नाहीये, तेव्हा तिच्या वर्गमित्रांनी  अनपेक्षित दयाळूपणे प्रतिसाद दिला .

काका मॅक्स प्रमाणे , काही पूर्व युरोपिय ज्यु  स्थलांतरित्यांनी सामान्य स्टोर उघडण्यासाठी १९ व्या आणि २० व्या शतकाच्या उत्तरार्धात मिनेसोटाच्या आयर्न रेंजमध्ये स्तलांतर केले. या शहरामध्ये ते फक्त एकमेव ज्यु होते.

हॅनाच्या वडिलांप्रमाणे इतर ज्यूंचा जन्म मिनियापोलीसमध्ये स्थलांतरित पालकांकडे झाला . मंदीच्या काळात काही लोकांच्या नोकऱ्या गेल्या . ह्या गोष्टींमध्ये हॅनाचे बाबा लकी होते कि त्यांना त्यांच्या भावाच्या कौंटुबिक व्यवसायात नवीन काम मिळाले , जरी त्याचा अर्थ त्यांच्या कुटुंबाला संपवून टाकणे असा होता . ऐतिहासिक अचूकतेसाठी मी वंशावलीतज्ञ जोआन शेर यांचे आभार मानू इच्छितो .

समाप्त